**अॅड. ऋषीकेश चितळे, अॅड. सुयोग देशपांडे, व अॅड. गुंजन मांगला यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**अहेरी पो.स्टे., गडचिरोली शहर येथे दाखल गु.र.क्र. ३०१७/२०१३, या गुन्हयातून उद्भवणाऱ्या एस.एल.पी.क्र. ११०७२-७३/२०२२ Special Leave Petition (Criminal Dairy No.३३१६४/२०२२) या प्रकरणात मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल याचिकेच्या न्यायालयीन कामकाजासाठी.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी-०१२३/प्र.क्र.१४/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: १३ एप्रिल, २०२३

**संदर्भ** :- (१) विधि व न्याय विभाग, शासन पत्र क्र.०३/१७३/एसपीपी/२०२३,दि. १३.०१.२०२३
(२) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. २९.०७.२०१५.
(३) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. १६.०६.२०१७.

**शासन निर्णयः-**

अहेरी पो.स्टे., गडचिरोली शहर येथे दाखल गु.र.क्र. ३०१७/२०१३, या गुन्हयातून उद्भवणाऱ्या न्याय प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल एस.एल.पी.क्र. ११०७२-७३/२०२२ Special Leave Petition (Criminal Dairy No.३३१६४/२०२२) या याचिकेच्या अनुषंगाने विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून काम पाहण्यासाठी अॅड. ऋषीकेश चितळे, अॅड. सुयोग देशपांडे, व अॅड. गुंजन मांगला त्यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली**
**व्यावसायिक फी (अॅड. ऋषीकेश चितळे)**

प्रतिदिन सुनावणी फी - रू. १,००,०००/- (अक्षरी एक लाख रूपये फक्त)
विचारविनिमय फी - रु.२५,०००/- (अक्षरी रुपये पंचवीस हजार फक्त)
प्रवास, निवास व इतर संकिर्ण खर्च - शासकीय नियमाप्रमाणे

**व्यावसायिक फी (अॅड. सुयोग देशपांडे)**

प्रतिदिन सुनावणी फी - रू. ३०,०००/- (अक्षरी तीस हजार रूपये फक्त)
प्रवास, निवास व इतर संकिर्ण खर्च - प्रत्यक्ष खर्च

**व्यावसायिक फी (अॅड. गुंजन मांगला)**

प्रतिदिन सुनावणी फी - रू. ४५,०००/- (अक्षरी पंचेचाळीस हजार रूपये फक्त)
प्रवास व निवास खर्च - प्रत्यक्ष खर्च

सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ अॅड. ऋषीकेश चितळे, अॅड. सुयोग देशपांडे, व अॅड. गुंजन मांगला यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकाकडून तपासून, प्रमाणित करून घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या “मागणी क्रमांक बी-१, २०५५ पोलीस -(००)१०९, जिल्हा पोलीस (००)(०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८)- २८ व्यायसायिक सेवा”या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत शासन निर्णय संदर्भ क्र. २ व ३ वरील वित्त विभाग शासन निर्णयानुसार मा. उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालयात न्यायालयीन प्रकरणी नेमण्यात आलेल्या विशेष सरकारी अभियोक्त्यांना फी अदा करण्यासंदर्भात प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२७१२४८४१४४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANDEEP BHIVRAJ PAWAR

Digitally signed by SANDEEP BHIVRAJ PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=ff342077573d6da5d5f85c3d90fda86e6ede5234a80cc83053f54097b9680600, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0B2AF4F18680EBFC370E00D1233E3FBC06707953799167BB51529B858E2004E0, cn=SANDEEP BHIVRAJ PAWAR
Date: 2023.04.27 12:54:00 +05'30'

**( संदीप भि. पवार )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. पोलीस महासंचालक,महाराष्ट्र मुंबई.
२. पोलीस उप महानिरिक्षक,गडचिरोली परिक्षेत्र,कॅम्प नागपूर.
३. पोलीस अधीक्षक,गडचिरोली.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२ , मुंबई/नागपूर .
५. जिल्हा लेखा अधिकारी, गडचिरोली
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, गडचिरोली
७. ॲड. ऋषीकेश चितळे, अधरिता लॉ,टिकेकर रोड, धांतोली रोड,नागपूर-४४००१२
८. ॲड. सुयोग देशपांडे, अधरिता लॉ,टिकेकर रोड, धांतोली रोड,नागपूर-४४००१२
९. ॲड. गुंजन मांगला, २९,जॉली मेकर चेंबर-II, नरीमन पॉइंट,मुंबई-४०००२१
८. विधी व न्याय विभाग (अ शाखा), मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (पोल-१०).